महात्मा जोतिराव फुले शेतकरी
कर्जमुक्ती योजना २०१९

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग,**
**शासन निर्णय क्र. कृकमा १२१९/प्र.क्र.१५७/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २२ मे, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा १२१९/प्र.क्र.१५७/२-स, दि.२७.१२.२०१९

२) शासन पूरकपत्र, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा १२१९/प्र.क्र.१५७/२-स, दि.१०.२.२०२०

प्रस्तावना :-

दि.१.४.२०१५ ते दि. ३१.३.२०१९ पर्यंतच्या कालावधीसाठी अल्पमुदतीचे पीक कर्ज घेतलेल्या, तसेच, या कालावधीत घेतलेल्या अल्पमुदतीच्या पीक कर्जाचे पुनर्गठन / फेरपुनर्गठन केलेल्या कर्जामधील दि.३०.९.२०१९ रोजी रु.२.०० लाखापर्यंत थकीत व परतफेड न झालेली रक्कम असलेल्या थकबाकीदार शेतक-यांना दिलासा देण्यासाठी “महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९” या कर्जमुक्ती योजनेचा निर्णय दि.२४.१२.२०१९ च्या मंत्रीमंडळ बैठकीत घेण्यात आला. त्यानुसार दि.२७.१२.२०१९ रोजी योजनेचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला असून योजनेची अंमलबजावणी सुरु आहे. आतापर्यंत जवळजवळ १९ लाख खातेदारांना योजनेचा लाभ देण्यात आला असून उर्वरितांना लाभ देण्याची कार्यवाही चालू आहे.

सदर योजनेचा उद्देश शेतक-यांना कर्जमुक्तीचा लाभ देऊन त्यांची कर्ज खाती निरंक करुन त्यांना खरीप २०२० हंगामामध्ये पीक कर्ज उपलब्ध करुन देणे असा आहे. सदर योजनेमध्ये पात्र खातेदाराची यादी प्रसिध्द झाल्यानंतर यादीमधील खातेदारानी प्रमाणिकरण करणे अभिप्रेत आहे. अशा प्रमाणिकरणानंतर ज्या खातेदारांनी प्रमाणिकरण केले आहे अशा खातेदारांच्या कर्जखात्यावर कर्जमुक्तीची रक्कम शासनातर्फे संबंधीत बँकांना देण्यात येते. मार्च,२०२० मध्ये सदर योजनेची अंमलबजावणी सुरू असताना सद्यस्थितीत जगभर कोव्हीड-१९ (कोरोना विषाणू) मुळे आपत्ती व्यवस्थापन कायदा २००५ अंतर्गत राज्यात दिनांक २४.०३.२०२० पासून ते दि.३१ मे २०२० पर्यंत लॉकडाऊन करण्यात आलेले आहे. इतकेच नव्हे तर सदर साथीच्या रोगामुळे राज्याचे उत्पन्नाचे स्त्रोतही रोडावले आहे. तसेच, उपलब्ध असलेला निधी या रोगावर उपाययोजनेसाठी वळवण्यात आला आहे असे वित्त विभागाकडून कळविण्यात आले आहे. निधीअभावी “महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९” या योजनेमधील उर्वरित पात्र लाभार्थ्यांना लाभ देणे तुर्तास शक्य होणार नाही. सदर लाभार्थ्यांना योजनेअंतर्गत लाभ मिळून त्यांची खाती निरंक न झाल्यास त्यांना सद्यस्थितीत सुरु झालेल्या खरीप २०२० हंगामामध्ये नवीन पीक कर्ज मिळू शकणार नाही.

महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ चा उद्देश थकबाकीत असलेल्या शेतक-यांना कर्जमाफीचा लाभ देऊन, त्यांची कर्ज खाते निरंक करुन त्यांना खरीप २०२० मध्ये पीक कर्ज घेण्यास पात्र करणे असा आहे. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता सदर योजनेअंतर्गत पात्र लाभार्थ्यांची खाती लवकरात लवकर निरंक व्हावी व त्यांना खरीप २०२० हंगामामध्ये नवीन पीक कर्ज मिळावे यासाठी बँकांना निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ या कर्जमुक्ती योजनेअंतर्गत शासनाकडून प्रसिध्द केलेल्या यादीमधील ज्या शेतक-यांच्या कर्जखात्यामध्ये कर्ज माफीच्या लाभाची रक्कम अद्याप जमा झालेली नाही अशा खात्यांबाबत पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

### अ) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेतील खाती :-

१) महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ या कर्जमुक्ती योजनेअंतर्गत शासनाकडून योजनेच्या पोर्टलवर प्रसिध्द केलेल्या यादीमधील ज्या लाभार्थ्यांना त्यांच्या कर्जखात्यावर योजनेंतर्गत लाभ देण्यात आला नाही अशा लाभार्थ्यांना थकबाकीदार न मानता खरीप २०२० साठी पीक कर्ज द्यावे.

२) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांनी कर्जमुक्ती योजने अंतर्गत वर नमूद केलेल्या थकबाकीदार शेतक-यांच्या कर्ज खात्यावर योजनेअंतर्गत निर्गमित केलेल्या यादीमधील थकबाकीची रक्कम शासनाकडून येणे दर्शवावी. जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांनी या अनुषंगाने संबंधीत विविध कार्यकारी सहकारी संस्था यांना कळवावे. संबंधीत विविध कार्यकारी सहकारी संस्था यांनी अशा शेतक-यांच्या कर्ज खात्यावर असलेली रक्कम "शासनाकडून येणे दर्शवावी" व त्यांनी अशा शेतक-यांस खरीप २०२० साठी पीक कर्ज द्यावे.

३) शासनाकडून येणे रकमेवर वर नमूद केल्याप्रमाणे जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांनी दिनांक ०१.०४.२०२० पासून सदर रक्कम त्यांना प्राप्त होण्याच्या दिनांकापर्यंत, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांनी त्यावर व्याज आकारणी करावी. शासनाकडून संबंधित जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेस असा निधी व्याजासह देण्यात येईल. मात्र सदर योजनेमध्ये पोर्टलवर प्रसिद्ध केलेल्या यादीमधील ज्या शेतकऱ्यांच्या कर्जखात्यावर कर्जमुक्तीची रक्कम जमा झाली नाही अशा शेतकऱ्यांना संबंधित जिल्हा मध्यवर्ती बँकांनी खरीप २०२० साठी पीक कर्ज उपलब्ध करून दिल्यास, अशाच खातेदारांच्या कर्जमुक्ती योजनेंतर्गत शासनाकडून देय असलेल्या रकमेवर शासन संबंधित जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना व्याज देईल.

### ब) व्यापारी बँका व ग्रामीण बँकेतील खाती :-

१) महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ या कर्जमुक्ती योजनेअंतर्गत शासनाकडून योजनेच्या पोर्टलवर प्रसिध्द केलेल्या यादीमधील लाभार्थ्यांच्या कर्जमाफीची रक्कम व्यापारी बँका व ग्रामीण बँका यांनी "शासनाकडून येणे दर्शवावी" तसेच, व्यापारी व

ग्रामीण बँकामध्ये शेतक-यांच्या NPA कर्ज खात्यावर शासनाकडून अशा कर्जखात्यांवर देय असलेली रक्कम "शासनाकडून येणे दर्शवावी" व याशिवाय अशा NPA कर्ज खात्यांवर बँकांनी सोसावयाची रक्कम (Hair cut) याचा अशा कर्जखात्यामध्ये अंर्तभाव करावा.

२) व्यापारी बँका व ग्रामीण बँकांनी तात्काळ लाभार्थी शेतक-यांना खरीप २०२० साठी नवीन पीक कर्ज उपलब्ध करुन दयावे.

३) व्यापारी बँका व ग्रामीण बँकांनी लाभार्थ्यांच्या कर्जखात्यावर शासनाकडून येणे रकमेवर वर नमूद केल्याप्रमाणे देय असलेल्या रक्कमेवर दिनांक ०१.०४.२०२० पासून त्यांना सदर रक्कम प्राप्त होण्याच्या दिनांकापर्यंत, अशा बँकानी त्यावर व्याज आकारणी करावी. शासनाकडून संबंधित व्यापारी व ग्रामीण बँकेस असा निधी व्याजासह देण्यात येईल. मात्र सदर योजनेमध्ये पोर्टलवर प्रसिद्ध केलेल्या यादीमधील ज्या शेतकऱ्यांच्या कर्जखात्यावर कर्जमुक्तीची रक्कम जमा झाली नाही अशा शेतकऱ्यांना संबंधित व्यापारी बँका व ग्रामिण बँकांनी खरीप २०२० साठी पीक कर्ज उपलब्ध करून दिल्यास, अशाच खातेदारांच्या कर्जमुक्ती योजनेंतर्गत शासनाकडून देय असलेल्या रकमेवर शासन संबंधित व्यापारी बँक व ग्रामिण बँक यांना व्याज देईल.

योजनेच्या अंमलबजावणीची कार्यवाही यापुर्वी विहीत केल्यानुसार उपरोक्त बदल विचारात घेऊन करण्यात यावी.

सदर बदलाच्या अनुषंगाने अंमलबजावणी करत असताना आवश्यकता भासल्यास विभागामार्फत विविध घटकांसाठी सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १६१/२०२०/व्य.२ दि.१४/५/२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००५२२१३०५०५७८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.05.22 14:04:15 +05'30'

( रमेश शिंगटे )
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३) मा. विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य (सर्व)
४) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव

५) मा. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
७) मुख्य महाप्रबंधक, भारतीय रिझर्व्ह बँक, केंद्रीय कार्यालय, मुंबई
८) मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड प्रादेशिक कार्यालय, पुणे
९) अध्यक्ष/व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई
१०) चेअरमन, राज्य स्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र,पुणे.
११) विभागीय आयुक्त, (सर्व)
१२) जिल्हाधिकारी (सर्व)
१३) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१४) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक (सर्व)
१७) निवडनस्ती